**महाराष्ट्र शासन**

**लिपिक-टंकलेखक पायाभूत प्रशिक्षण/तात्काळ**

क्रमांक: प्रशिक्षण २०१८/प्र.क्र.१३७/१४-अ
सामान्य प्रशासन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०१८.

**प्रति,**
सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालय, मुंबई.

**विषय:-** राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०१८-२०१९ मधील प्रशिक्षण मंत्रालयीन लिपिक-टंकलेखक संवर्गाकरिता पायाभूत प्रशिक्षण

**संदर्भ:-** १. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) यांचे पत्र क्रमांक STPEA/२०१८-१९/Mantra & RATI/४१६, दिनांक ०६-१०-२०१८.
२. समक्रमांकाचे दिनांक २५ सप्टेंबर, २०१८ व दिनांक २९ सप्टेंबर, २०१८.

महोदय,

संदर्भाधीन क्रमांक २ वरील पत्रान्वये मंत्रालयीन लिपिक-टंकलेखक संवर्गाकरीता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) यांचेमार्फत विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक, कुंडल सांगली, अमरावती, व नागपूर येथे पायाभूत प्रशिक्षण आयोजित करण्यात आलेले आहे.

२. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक १ वरील पत्रान्वये महाराष्ट्र विधानमंडळाचे हिवाळी अधिवेशन दिनांक १९ नोव्हेंबर, २०१८ पासून सुरु होत असल्यामुळे दिनांक २६-११-२०१८ ते दिनांक ०७-१२-२०१८ या प्रशिक्षण कालावधीत बदल करुन सुधारित कालावधीत प्रशिक्षण आयोजित केल्याबाबत कळविलेले आहे. त्यानुसार खालील संस्थांमधील प्रशिक्षणाचा कालावधीत बदल करण्यात येत असून सुधारित कालावधीत रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविल्यानुसार प्रशिक्षण आयोजित करण्यात येत आहे:-

| प्रपत्र | प्रशिक्षण संस्थेचे नांव | संपर्कासाठी व्यक्तीचे नांव दूरध्वनी क्रमांक | मूळ कालावधी | सुधारित कालावधी | कार्यमुक्त करण्याचा दिनांक | प्रशिक्षणार्थींची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, कुंडल, सांगली** | दूरध्वनी क्रमांक ०२३४६-२७१२१२, प्रशिक्षण निर्देशक:- श्री.शेटे मो-८२७५०५७७३५ | दि. २६-११-२०१८ ते दि. ०७-१२-२०१८ | दि. १०-१२-२०१८ ते दि. २१-१२-२०१८ | दिनांक ०७-१२-२०१८ (म.नं.) | ४० |
| २ | **विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, अमरावती** | दूरध्वनी क्रमांक ०७२१-२६६५४७६, श्री.टेकाळे मो-९६७३६१०१७० | दि. २६-११-२०१८ ते दि. ०७-१२-२०१८ | दि. १०-१२-२०१८ ते दि. २१-१२-२०१८ | दिनांक ०७-१२-२०१८ (म.नं.) | ४० |
| ३ | **विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नागपूर** | दूरध्वनी क्रमांक सहयोगी प्राध्यापक, श्री.संदीप खोडवे मो-९४२२८१०८२३ / श्रीम. सुषमा देशमुख मो-९८२३७८३६८६ | दि. २६-११-२०१८ ते दि. ०७-१२-२०१८ | दि. १०-१२-२०१८ ते दि. २१-१२-२०१८ | दिनांक ०७-१२-२०१८ (म.नं.) | ४० |

३. सदरचे प्रशिक्षण राज्य प्रशिक्षण धोरणानुसार देण्यात येत असुन उपस्थिती अनिवार्य आहे. या विभागाच्या शासन परिपत्रक दि.१३ मे, २०१५ नुसार देण्यात आलेल्या सूचना संबंधितांच्या निदर्शनास आणाव्यात. प्रस्तुत कालावधीतच पायाभूत प्रशिक्षण घेण्यात येणार असल्यामुळे सर्व संबंधित लिपिक-टंकलेखकांचे प्रशिक्षण या कालावधीतच पुर्ण होणे जरुरीचे आहे. प्रशिक्षणातून सूट/प्रशिक्षण रद्द करण्याबाबत प्राप्त झालेल्या अर्जाची/ पत्राची दखल घेतली जाणार नाही तसेच मंत्रालयीन विभागांनी देखील या संदर्भातील प्राप्त अर्जांचा विचार करु नये.

४. अपवादात्मक परिस्थितीत नामनिर्देशित लिपिक-टंकलेखकास प्रशिक्षणास उपस्थित राहणे/पाठविणे शक्य नसल्यास त्यांच्या प्रशिक्षण तुकडीत अदलाबदल करुन त्यांस पायाभूत प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त करण्याची कार्यवाही परस्पर विभागामार्फत करण्यात यावी व त्यांची प्रत प्रशिक्षण संस्था व या विभागास (कार्यासन-१४अ) पाठविण्यात यावी.

५. विभागातील जे लिपिक-टंकलेखक प्रतिनियुक्तीवर कार्यरत आहेत त्यांच्याबाबतीत प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त करण्याच्या सूचना विभागाच्या स्तरावरुन संबंधित कार्यालयास देण्यात याव्यात.

६. **प्रवासासाठी आरक्षणाची गरज लक्षात घेऊन प्रशिक्षण कालावधीबाबत संबंधित विभागाने तात्काळ प्रशिक्षणार्थींस कळवावे.** प्रशिक्षण ठिकाणे व हवामान विचारात घेऊन आवश्यक कपडे, ट्रॅक सूट व स्पोर्टस शूज नेण्याची काळजी प्रशिक्षणार्थींनी घ्यावी. प्रशिक्षण दिनांकाच्या पुर्वी (१ दिवस) जे प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण संस्थेमध्ये उपस्थित राहणार असतील त्यांनी संबंधितांशी संपर्क साधून जेवणासाठी ते उपस्थित राहणार आहेत किंवा कसे याबाबत प्रशिक्षण संस्थेस पुर्व कल्पना द्यावी. सदर प्रशिक्षण कालावधीच्या शेवटच्या दिवशी प्रशिक्षणा दरम्यान शिकवलेल्या बाबींची लेखी परीक्षा घेऊन मुल्यांकन करण्यात येईल, याबाबतच्या सूचना संबंधित विभागाने प्रशिक्षणार्थींना कार्यमुक्त करण्याच्या आदेशात नमूद कराव्यात.

७. परिच्छेद २ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त करण्याच्या दिनांकास प्रशिक्षणार्थींना कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. नामनिर्देशित व्यक्तीस संबंधित विभागप्रमुखांनी कार्यमुक्त करणे सक्तीचे आहे. सदर आदेशाची एक प्रत संबंधित प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना (email-amaravatiprabodhini@gmail.com/ prabodhininashik@gmail.com / dgkundalacademy@gmail.com / sameti123@yahoo.co.in ) तसेच या कार्यासनास (vrishali.bhingarde@nic.in) पाठविण्यात यावी.

८. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१२४०५११३०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.10.12 12:43:01 +05'30'

**( इ.मु.काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत- माहिती व पुढील कार्यवाहीस्तव**

१) महासंचालक, प्रशासकीय शिक्षण संस्था, यशदा, पुणे.

२) उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण धोरण मूल्यमापन यंत्रणा, यशदा, पुणे
३) अतिरिक्त संचालक, प्रशासकीय शिक्षण संस्था, यशदा, पुणे.
४) संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, विभागीय आयुक्त कार्यालय, इंडिया सिक्युरीटी प्रेससमोर, नाशिक रोड, जिल्हा-नाशिक, पिन-४२२ १०१.
५) महासंचालक, कुंडल ॲकॅडमी ऑफ डेव्हलपमेंट ॲडमिनिस्ट्रेशन ॲन्ड मॅनेजमेंट (फॉरेस्ट) मु.पो. कुंडल, ता.पलुस, जिल्हा-सांगली.
६) डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नवीन प्रशासकीय इमारत, तपोवन रोड, अमरावती विद्यापीठासमोर, जिल्हा-अमरावती
७) वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती) व्ही.आय.पी. रोड, धरमपेठ, नागपूर, पिन-४४००१०.
८) उप सचिव (सेवा)(कार्यासन-१७), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उप सचिव (प्रशिक्षण), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन-१२-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.